**<u>उन्नत महाराष्ट्र अभियान</u>**

**अभियांत्रिकी महाविद्यालये तसेच तंत्रनिकेतने व अन्य शैक्षणिक संशोधन संस्थामधील विद्यार्थ्यांना राज्याच्या विकासात सहभागी करून घेण्याची योजना...**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्रशिक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : धोरण ३०११/(४५/१६)/तांशि-२,**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ५ जुलै, २०१७

**<u>संदर्भ :</u>**- १. शासन निर्णय क्रमांक : बैठक ३६११/(५६/१५)/तांशि-२,दिनांक१३/०१/२०१६

२.शासन परिपत्रक क्र.डीएपी-१०१६/प्र.क्र.८६/का.१४८१ दिनांक ७/४/२०१६

३. शासन निर्णय क्रमांक : धोरण ३०११/(४५/१६)/तांशि-२,दिनांक१५/६/२०१६

४.शासन शुध्दीपत्रक क्रमांक: धोरण ३०११/(४५/१६)/तांशि-२, दिनांक१८/१०/२०१६

**<u>प्रस्तावना -</u>**

उन्नत महाराष्ट्र अभियान तसेच उन्नत भारत अभियान ही राज्यातील अभियांत्रिकी महाविद्यालय तसेच तंत्रनिकेतन व अन्य शैक्षणिक व संशोधन संस्थांमधील विद्यार्थ्यांना राज्याच्या विकासात सहभागी करुन घेण्याची योजना अनुक्रमे संदर्भाधिन क्रमांक १ येथील दि. १३ जानेवारी, २०१६ व संदर्भाधिन क्रमांक ३ येथील दि.१५/६/२०१६ च्या शासन निर्णयानुसार कार्यान्वित करण्यात आली आहे. तसेच संदर्भाधिन क्रमांक २ येथील दिनांक ७/४/२०१६ च्या शासन परिपत्रकान्वये अभियानाकरीता निधी उपलब्धतेच्या अनुषंगाने नियोजन विभागाने सूचना निर्गमित केल्या आहेत. दि. १३ जानेवारी, २०१६ च्या शासन निर्णयात नमूद केल्यानुसार सदरच्या अभियानाच्या सर्वोच्च पातळीवर सल्लागार समिती आहे. समितीच्या कार्यकक्षेत इतर बाबींसोबत विविध शैक्षणिक संस्थांचा सहभाग आवश्यकतेनुसार उपलब्ध करुन देणे, हि बाब नमूद केलेली आहे. तसेच शासन निर्णयात अभियानात सहभागी संस्थां व्यतिरिक्त इतर इच्छूक उच्च शिक्षण संस्थांना यात सहभागी होण्याची तरतूद आहे. यासाठी अभियानाअंतर्गत सल्लागार समितीने निश्चित केलेल्या निकषानुसार व प्रादेशिक गरजानुसार संस्थांची वेळोवेळी निवड करण्यात येईल, अशी तरतूद करण्यात आलेली आहे.

या संदर्भात अध्यक्ष, सल्लागार समिती, उन्नत महाराष्ट्र अभियान यांनी सूचित केल्यानुसार अभियानाची व्याप्ती वाढविण्यासाठी काही संस्थांचा सहभाग करुन घेण्याचे प्रस्तावित होते. यासाठी नोव्हेंबर, २०१६ मध्ये राज्यातील विविध संस्थांना ई-मेल द्वारे सूचित करुन अर्ज मागविण्यात आले. तसेच, अभियानाबाबत मार्गदर्शक कार्यशाळा देखील घेण्यात आली. तद्नंतर CTARA, IIT Bombay येथील चमूने राज्यातील इच्छूक संस्थांची प्रत्यक्ष पाहणी करुन व निश्चित केलेल्या निकषांनुसार तपासणी करुन १२ संस्थांची निवड केली

होती. या १२ संस्था, त्यांची पात्रता, निवडीचे निकष या अनुषंगाने उन्नत महाराष्ट्र अभियान सल्लागार समितीच्या दि. २४ मे २०१७ च्या बैठकीत सादरीकरण करण्यात आले. सल्लागार समितीच्या दिनांक २४ मे, २०१७ च्या बैठकीत ठरल्यानुसार या १२ संस्थांना मूळ सहभागी संस्था समवेत उन्नत महाराष्ट्र अभियानात सहभागी करुन घेण्याचे ठरविण्यात आले आहे. त्यानुसार संदर्भाधिन क्रमांक ३ व ४ येथील शासन निर्णय व शासन शुध्दीपत्रकात नमूद संस्थांव्यतिरिक्त उक्त नमूद १२ संस्थांना देखील अभियानात सहभागी करुन घेण्याचा प्रस्ताव संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांनी शासनास सादर केला होता.

प्रस्तुत प्रकरणी उन्नत महाराष्ट्र अभियानाकरीता गठित केलेल्या राज्य सल्लागार समन्वय समितीच्या दिनांक २४ मे, २०१७ च्या बैठकित घेतलेल्या निर्णयानुसार उन्नत महाराष्ट्र अभियानाकरीता निश्चित केलेले जिल्हे व शैक्षणिक संस्था यात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

उन्नत महाराष्ट्र अभियानाकरीता संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक १३/१/२०१६ च्या शासन निर्णयानुसार गठित केलेल्या राज्य सल्लागार समन्वय समितीच्या दिनांक २४ मे, २०१७ रोजीच्या बैठकित १२ शैक्षणिक संस्थांना उन्नत महाराष्ट्र अभियानात समाविष्ट करण्याचा निर्णय घेतला आहे. उन्नत महाराष्ट्र अभियानाच्या राज्य सल्लागार समन्वय समितीने घेतलेल्या निर्णयानुसार उन्नत महाराष्ट्र अभियानाकरीता निश्चित केलेले जिल्हे व शैक्षणिक संस्था या करीता संदर्भाधिन शासन निर्णय व शासन शुध्दीपत्रकाशिवाय पुढिल १२ संस्थांचा समावेश करण्यात येत आहे. सदरच्या १२ संस्थांकरीता संदर्भाधिन क्रमांक १,२ व ३ येथील शासन निर्णय/ शासन परिपत्रकातील तरतुदी लागु राहतील.

| अ.क्र. | जिल्हा | समन्वयक संस्था |
|---|---|---|
| १ | कोल्हापूर | तात्यासाहेब कोरे इस्टिटयुट ऑफ इंजिनियरिंग ॲन्ड टेक्नॉलॉजी, वारणानगर |
| २ | कोल्हापूर | डी. वाय. पाटील कॉलेज ऑफ इंजिनियरिंग ॲन्ड टेक्नॉलॉजी, कोल्हापूर |
| ३ | कोल्हापूर | कोल्हापूर इस्टिटयुट ऑफ टेक्नॉलॉजी कॉलेज ऑफ इंजिनियरिंग, कोल्हापूर |
| ४ | औरंगाबाद | ग्रामोद्योगिक शिक्षण मंडळाचे महाराष्ट्र इस्टिटयुट ऑफ टेक्नॉलॉजी, औरंगाबाद |
| ५ | रत्नागिरी | घरडा फाऊंडेशन घरडा इस्टिटयुट ऑफ टेक्नॉलॉजी, खेड, रत्नागिरी. |

| अ.क्र. | जिल्हा | समन्वयक संस्था |
|---|---|---|
| ६ | अहमदनगर | अमृतवाहिनी शेती आणि शिक्षण विकास संस्था अमृतवाहिनी कॉलेज ऑफ इंजिनियरिंग, संगमनेर. |
| ७ | सांगली | शेतकरी शिक्षण मंडळाचे पदश्री वसंतरावदादा पाटील इस्टिटयुट ऑफ टेक्नॉलॉजी, बुधगांव, सांगली. |
| ८ | अमरावती | प्रो. राम मेघे इस्टिटयुट ऑफ टेक्नॉलॉजी अॅन्ड रिसर्च, अमरावती. |
| ९ | सातारा | रयत शिक्षण संस्थेचे कर्मविर भाऊराव पाटील कॉलेज ऑफ इंजिनियरिंग, सातारा |
| १० | धुळे | श्री शिवाजी विद्या प्रसारक संस्थेचे स्व. बापुसाहेब शिवाजीराव देवरे कॉलेज ऑफ इंजिनियरिंग, धुळे |
| ११ | सोलापूर | वालचंद इस्टिटयुट ऑफ टेक्नॉलॉजी, सोलापूर |
| २२ | सोलापूर | एसव्हीईआरआय चे कॉलेज ऑफ इंजिनियरिंग, पंढरपुर. |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७०५१५२०४४१३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Bhaskarrao Avhad

Digitally signed by Prakash Bhaskarrao Avhad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e09e7338f45626229cb6381e8154da93814d3127e9859a46e544f505defcd004, cn=Prakash Bhaskarrao Avhad
Date: 2017.07.05 15:22:40 +05'30'

**( प्रकाश भा. आव्हाड)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) / मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), मंत्रालय, मुंबई
४. मा. सर्व मंत्री / सर्व मा. राज्यमंत्री, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
५. मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/ विधान सभा, विधान भवन, मुंबई.
६. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
७. जिल्हाधिकारी, कोल्हापूर, सातारा , सांगली ,सोलापूर, अहमदनगर, धुळे, औरंगाबाद, रत्नागिरी, अमरावती
८. सर्व सहसचिव / उपसचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय / सर्व सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालये
१०.अवर सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-३२
११.संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
१२.निवड नस्ती-तां.शि.-२